नवनाथ भक्तिसार   अध्याय एकविसावा

येनकेन प्रकारे नर्तकी कलिंगेच्या कलापथकासोबत गोरक्षनाथ आपल्या श्रीगुरूंच्या जवळ तर येऊन पोहोचले. आता फक्त राजमहालात प्रवेश करणे महत्वाचे होते. दरम्यानच्या कालावधीत हनुमंताने महाराणी मैनाकिनीच्या महालात भल्या पहाटे सूक्ष्म रुपात प्रवेश करून तिला गोराक्षा विषयी सावध केले, मैनाकिनीला झोपेतून उठविताना त्याने तिला 'किलोत्त्ला' व 'पद्मिनी' या नावाने संबोधले या मागची पार्श्वभूमी अशी होती की मैनाकिनीचा प्रमाद, उपरिचर वसुंनी दिलेला शाप, नंतर क्षमायाचना मागितल्यावर मिळालेला उःशाप आणि त्यामुळे मिळालेले महराणीपद यांची सखोल माहिती समजली.

महाराणीकडून, कलिंगेला आपल्या कलावंतिणी सोबत नृत्य गायन वादन सदर करण्याची परवानगी मिळाली. पण पुर्वंडा नावने सोबत असलेल्या गोरक्षाला नृत्य महालात नेण्यावरून कलिंगेने एक मुद्दा उपस्थित केला की कलाकार म्हणून एक पुरुष माझ्या पथकातून कसा येऊ शकतो? जरी तू उत्कृष्ट वादनकार असलास तरी पण स्त्री राज्यात तुझे अस्तित्व विकल्प निर्माण करणारे आहे. तेव्हा गोरक्षाने, "मी स्त्री वेष धारण करून येईन" असा प्रस्ताव मांडला आणि स्त्रीवेष धरण करून गोरक्ष, नर्तकी म्हणून पुखंडा नावाने कलिंगा सोबत रंगमहालात येऊन पोहोचला. मृदुंग वादन करतांना अत्यंत कलात्मक पद्धतीने 'चलो मच्छिंदर गोरक्ष आया' हे शब्द ध्वनी रुपात मृदुंगावर उमटविले. हा सूचक इशारा आपल्यासाठीच आहे याची जाणीव मच्छिंद्रनाथांना झाली. यथावकाश गुरुशिष्यांची भेटी झाली!

स्त्री राज्याची महाराणी किलोत्त्ला उर्फ मैनाकिनी गोरक्षनाथाचे पुत्रवत संगोपन करीत आहे. उदरी जन्मलेल्या मीननाथापेक्षाही गोरक्षाचे कोडकौतुक जास्त चालू आहे. तृषार्त चातकाला मेघ जलपान करवितो, किंवा गोमाता पान्हा सोडून बछड्याला दुग्धपान करविते, त्याप्रमाणे किलोत्त्ला गोरक्षावर मायेची पखरण घालीत आहे. तो भोजन करीत असतांना त्याच्या जवळ बसून माशा त्याच्या अन्नाला वा चेर्याला चेहऱ्याला स्पर्श करू नयेत म्हणून उडवत राहणे. त्याला गर्व लागावा म्हणून पंख्याने वारा घालणे. आग्रहाने त्याच्या आवडीचे पदार्थ वाढणे, स्वहस्ते त्याला भरविणे. खास त्याच्या साठी लज्जात्दार आणि खमंग पदार्थ बनविणे. त्याला काय हवे, नको याच्याकडे जातीने लक्ष घालणे, अशी बडदास्त ठेवली जात आहे.

पण रोजरोजच्या या शाही बडदास्तीचा उलटा परिणाम होऊ लागला. गोरक्षनाथ मनात विचार करू लागले, "रोजची ही शाही बडदास्त आरोग्याला हानिकारक आहे. तिन्ही त्रिकाळ षड्रसयुक्त मिष्टान्न म्हणजे देहासाठी विषसमान आहे, शिवाय या खाद्याचा कंटाळा ही येऊ लागला आहे. मुख्य म्हणजे योग धर्माचा विसर पडत आहे हे इष्ट नाही." प्रदीर्घ चिंतनानंतर एक दिवस ते गुरु मच्छिंद्रनाथांना म्हणाले; "गुरुदेव! आपण या स्त्री राज्यात राहता हे नाथपंथी योगाचार्यासाठी अश्लाध्य आहे. माझ्या मनाला अजिबात पटत नाही, पितळी धातूंच्या कोंदणात हिरा, सम्राटाच्या हाती करवंटी, स्मशानभूमीवर श्रीमूर्ती तसे या नाशवंत मायावी वैभवात आपण पडला आहात. महायोगी म्हणून आपली ब्रम्हांडात तसेच मृत्युलोक, पातळ, एकवीस स्वर्गात कीर्ती पसरली होती. सार्वजण आपल्याप्रमाणे आदर्श योगी होण्याची इच्छा करीत होते, इतके आपण आदर्शमूर्ती होता, अशा आदर्शाच्या प्रतीकाने पाय घसरून गर्तेत पडावे हे बरे नाही. महाराज! शेळीच्या गळयात चिंतामणी शोभून दिसत नाही. तो चिंतामणीचा अपमान आहे. आपला लौकिक आणि ध्रुवासारखे अढळ स्थान, आपल्या पुर्व ईतिहासाचे स्मरण करावे, आपले पराक्रम आठवा, आपण कोण, कुठे होतो, कुठून

आलो, कोणत्या कार्यासाठी जन्मलो, हे सर्व मनाला विचारा. आपली पूर्वीची ब्रह्मस्थिती श्री कवीनारायणाची होती. लोकोपचारासाठी आपण मच्छिंद्र नावाने अवतार धारण केला आहे. बारा वर्षे खडतर तप पूर्ण केले. एक प्रज्ञावान धर्मपांथिक म्हणून आपला लौकिक झाला. जगाला सुपंथाला लावले. एवढ्या महानपदी असताना आपण धर्माचरण सोडले असेल तर सामान्य जनांना नावे ठेवण्याचा किंवा बोध करण्याचा आपल काय नैतिक अधिकार आहे? वरमायाच जर आळशी असेल तर व हाडणींना रुखवताचे काय मिळणार? राजानेच तस्करी स्वीकारली तर जनतेने कुठे आश्रय घावा? सुर्यानेच जर काळोखात तोंड लपवले तर किरणांनी काय करावे? चंद्राने तेजोहीन झाल्यावर तारांगणाने काय करावे? तुम्ही दुष्कृत्य केल म्हणून लोकांनीही तुमचे अनुकरण करावे का? महाराज तुमच्या अवताराला कलंक लागण्यापूर्वीच सावध व्हा. देहाला तिळा एवढाही डाग लागता कामा नये. आपल्या अंगाला जर मळ नसेल तर आपण कळी काळाचीही गठडी वळू शकतो. निर्भय राहून जगात वंदनीय होऊ शकतो. म्हणून महाराजा माझे ऐका. ह्या वैभवाचा त्यागू करून निःसंग व्हा. या पापमय अशा दुःखद नदीतून पार पडावे. विषय भोगापासून रजोगुण, क्रोध, मद, मत्सर वाढून दुःखाची फळे प्राप्त होतात. यमपुरी भोगावी लागते. महासर्पाचे हलाहल प्राशन करावयाचे आणि नंतर जीवाची काहिली शांत करण्यासाठी ज्ञानऔषधी शोधत बसण्यापेक्षा अगोदारच सावध पाऊल टाकणे हितकारक आहे. तेव्हा गुरुमहाराज सावध व्हा! आणि विषय भोग सोडून योग धर्माचा अंगीकार करावा.”

शिष्याचे अमृतबोल ऐकून महाराज मच्छिंद्रनाथांचे डोळे खाडकन उघडले. योगभ्रष्टतेची जाणीव होऊन पश्चाताप होऊ लागला. विरक्ती दाटून आली. उदास चित्ताने म्हणाले, “गोरक्षनाथा! तुझे बोल यथार्थ आहेत, अमोल आहेत, असो! प्रारब्ध योगाने जे घडणार होते ते घडून गेले आहे. आता आंपण आपल्या देशात जाऊ आणि उर्वारीत अवतार कार्य करू.”

गोरक्षनाथांनी त्याच्याकडून वचन घेतले. मनातले सर्व गढूळ जाऊन मनात पुन्हा गंगेसारखी निर्मलता आल्याने चित्तास समाधान वाटले. त्याच आनंदात दोघेही भोजन करून विश्राम करण्यासाठी गेले. शयनगृहात, महाराजांनी महाराणी जवळ विषय काढला, “प्रिये किलोत्त्मा! गोरक्ष मला घेऊन जाणार म्हणतो, परंतु माझा जीव तुझ्या भोवती घोटाळत आहे. काय करावे ते समजत नाही. जीव कासावीस होत आहे. “आपली इच्छा नसल्यास तो कसा काय नेईल तुम्हाला? असा प्रश्न महाराणीने केला. “प्रिये त्याने मला विरक्तपणाच्या गोष्टी सांगून माझ्या मनात नैराश्य उत्पन्न केले आणि भावनेच्या भरात माझ्याकडून वचन घेऊन बद्ध केले. आता काय करावे? त्यावर महाराणीला काय उत्तर द्यावे हे सुचेना ती गप्पच झाली.

“प्राणेश्वरी! मी सत्य तेच सांगत आहे. तुझ्यासाठी माझा जीव कासावीस होतो आहे. पण एक उपाय आहे, तू त्याला मोहित करून घ्यावा म्हणजे तो येथेच राहील.” महाराणी उद्वेगाने म्हणाली, “मोहाची सगळी प्रलोभने दाखवून झाली. तो पाषाणहृदयी मोहात सापडत नाही.” वेगवेगळया मार्गाने पुन्हा प्रयत्न करून पाहावा. कदाचित यश येईलसुद्धा!” अशा प्रकारची कुजबूज बराच वेळ चालली, रात्रीचे दोन प्रहर सरले, राजा राणीवर निद्रादेवी काही प्रसन्न होत नव्हती. त्याचवेळी गोरक्षनाथाच येत असल्याचा सांगावा आला. शयनमहालात त्याने प्रवेश करून त्याने मुजरा केला आणि चरण स्पर्श करून दर्शन घेतले. गुरुपत्नीकडे वळून म्हणाला, “मातोश्री! आता आम्ही दोघे तीर्थाटनास जाऊ इच्छित आहोत, आम्हाला आज्ञा द्यावी.”

"पुत्र गोरक्षा! तू माझा ज्येष्ठ पुत्र आहेस. तुझ्यावर माझी अपार ममता आहे. येथील सर्व स्त्रियांसह ही राजसंपत्ती तुझीच आहे. या सिंहासनावर केवळ तुझाच हक्क आहे, तुझी ती योग्यता सुद्धा आहे, तू राजा व्हावेस आणि लहान बंधू मीननाथाला हाताशी घेऊन शत्रूंचा कर्दनकाळ बनून यशस्वी रित्या राज्यकारभार कारावास अशी आमची इच्छा आहे. तुझ्या हाती राज्यकारभार सोपवून आम्ही निवृत्त होऊन देव धर्माचरण करावे असे मनात आहे. आमचाही देह विकल होत चालला आहे. वृद्धापकाली तूच आमचा आधार आहेस. तूच जर आम्हाला टाकून निघालास तर आम्ही निराधार होऊन परावलंबी होणे तुला चालेल काय? तू केवळ तुझाच हट्ट पूर्ण करणार असशील तर प्रथम मला विहिरीत ढकल अथवा समशेर उपसून आमचा शिरच्छेद कर आणि मग खुशाल हवे तसे वर्तन कर."

खडकावर पर्जन्यवर्षाव व्हावा त्याप्रमाणे असल्या साखर पेरणीने आणि धमकीचा हेतू प्रकट करून मानसिक दबाव आणण्याचा परिणाम गोराक्षावर यत्कीचिंतही झाला नाही. त्याचा निश्चय फतळाप्रमाणे अभंग आहे. ते महाराणीला उत्तरले, "मातोश्री, आपले विचार योग्य तेच आहेत. हे कामिनी राज्य आपले आहे, परंतु आमचे राज्य फार विशाल आहे. मी तर स्वर्ग, पृथ्वी आणि पाताळ या त्रिलोकाचा; जे धर्म, अर्थ, काम, मोक्ष या चार खांबावर स्थिर असलेल्या साम्राज्याचा महासम्राट आहे. त्यमुळे आम्हा उभयतांना तीर्थाटनास गेलेच पाहिजे, नाहीतर आमचा राज्यकारभार कसा चालायचा? तुम्ही येथे खुशाल वैभवात जगा ते आमचे उद्दिष्ट आणि कर्तव्य नाही. योगधारणा ही आमची संपत्ती आणि सदाचार, सत्कर्म हेच आमचे सुख आहे. तरी अडथळा आणू नये. आम्हाला निघण्याची आज्ञा द्यावी." महाराणी क्षणभर विचार करून म्हणाली, "ठीक आहे पुत्रा, तुझ्या मार्गात मी अडसर होणार नाही. परंतु माझ्यासाठी मातेच्या वेड्या ममतेसाठी एक वर्ष येथे रहावेस." "नाही मातोश्री! येथे चित्त रमत नाही. सहा महिने झाले, आता राहवत नाही." त्यावर महाराणी म्हणाली, "मग आणखी सहा महिने तरी थांबावे, नाहक घाई करून माझ्या मातृत्वाचा अपमान करू नकोस. मी तुझ्या श्रीगुरुंसह तुला तीर्थाटनासाठी पाठवीन." "जशी आज्ञा मातोश्री, परंतु सहा महिन्यानंतरचा दिवस आजच निश्चित करावा. त्यांत बदल होता कामा नये. त्या ठरलेल्या दिवशी कोटी कोटी प्रयत्न केले तरी आम्ही थांबणार नाही." संवत्सर प्रतिपदेच्या दिवशी भोजनोत्तर आपली रवानगी केली जाईल, हा माझा शब्द आहे. मग झाले." त्यावर, "ठीक आहे, आपल्या इच्छे खातर राहतो."

या घटनेनंतर बराच काळ गेला. वर्ष प्रतिपदा दिवसादिवसांनी जवळ येत आहे. महाराणीची घालमेल वाढत आहे. एक दिवस गोरक्षनाथांना आपल्या महालात बोलाविले आणि जवळ बसवून त्याचे मुख कुरवाळीत म्हणाली, "प्रिय पुत्रा, माझ्या मनातली एक इच्छा तुला सांगते. तुझा विवाह करून सूनसुख पाहण्याची माझी मनीषा आहे. सहा महिन्यानंतर तू तीर्थाटनास गेल्यानंतर, सुनेच्या आधाराने जगणे मला आवडेल. मला आधार आणि कर्तव्यपूर्तीचे समाधान मिळेल. तरी तू 'होकार' दे म्हणजे रूप, गुणसंपन्न मुलीशी तुझा विवाह उरकता येईल." "मातोश्री; गुरुकृपेने मला पूर्वीच दोन बायका लाभल्या आहेत, त्यांच्यासोबत मी नित्य योग संसार करीत आहे. माझ्या कर्णातील दोन कर्णमुद्रिका ह्या माझ्या दोन कांता आहेत, त्या दोघींना सोडून तिसरीशी विवाह करणे म्हणजे व्यभिचार आहे. तसेच गुरुभक्तीशी प्रतारणा करणे आहे." गोरक्षनाथाच्या युक्तीवादाने तिची बोलती बंद झाली. ही विरक्त वल्ली विषयात फसत नसल्याने ती निराश झाली.

आणखी काही दिवसांनी एक देखणी तरुणी गोरक्षनाथांच्या महालात आली, हातामध्ये सारीपाट घेऊन ती त्यांना म्हणाली, “राजकुमार! माझ्यासोबत सारीपट खेळाल का? “ठीक आहे सारीपाट मांड” संमती मिळताच ती नितंबिनी सारीपाट मांडून ध्युत खेळण्यासाठी गोराक्षांना खेटून बसली, खेळाच्या बहाण्याने स्पर्श करून, कामुक नेत्र कटाक्ष टाकत मधाळ भाष्य करू लागली. मुद्दामच पदर पाडून उन्नत उरोज उघडे केले, अजाणतेपणाचे सोंग घेऊन मांड्या उघड्या करून नग्नता दाखविली. तथापि गोरक्षनाथ त्या चाळयांमुळे बधले नाहीत, अचल राहिले. शेवटी सगळे देहचाळे आणि प्रयत्नांची पराकाष्टा करून दमल्यावर लज्जित होऊन ती निघून गेली. विरक्त स्थित प्रज्ञतेने गोरक्षनाथांनी कामिनी मोहमायेवर निर्विवाद विजय मिळवला.

एके दिवशी महाराणीकडून खजिना उघडण्याचा हुकुम झाला. अगणित संपत्तीचे भांडार प्रकटले. सोने, चांदी, रूपे यांसारखे मौल्यवान धातू, रत्ने, माणिक, मोती, हिरे पोवळे, अशा अनेक प्रकारच्या वस्तूंनी ठासून भरलेले संपत्तीचे कोठार उघडण्यात आले. पुत्र गोरक्षाला कोठारात नेऊन महाराणी म्हणाली, “पुत्रा गोरक्षा! हा पहा खजिना, हे सर्व तुझेच आहे, सूर्य असे पर्यंत हे कोठार रिक्त होण्याची शक्यता नाही, माझ्या प्रिय मुला, तू सुखात, वैभवात माझ्या नेत्रांसमक्ष रहावास अशीच माझी इच्छा आहे.” पण हा बार सुद्धा फुसका ठरला कारण अस्सल मौक्तीकाला काजळ चिकटत नसल्याने त्याला डागही लागत नाही, किंवा त्याची शुभ्रताही कमी होत नाही. त्याचप्रमाणे गोराक्षनाथांना जरा सुद्धा मोहाची बाधा झाली नाही. एक शब्द ही न बोलता शांतपणे ते तेथून निघून गेले. दारूण नैराश्याने महाराणीला दुःखाचा आवेग सहन करता आला नाही, ती हुंदके देऊन रडू लागली. छोट्या मीननाथाला मिठीत घेऊन शोक मग्न झाली. तिचे रुदन पाहून सेविकांनाही गलबलून आले. त्या म्हणाल्या, “महाराणी स्वामिनी! शोक आवरा. तुम्ही चिंता करू नका, आम्ही त्यांच्यावर मोहिनी घालू. तुम्ही दुःखी होऊ नका.”

अखेर वर्षप्रतिपदेचा दिवस उगवला. घरोघरी गुढ्या, तोरणे उभारून नववर्षाचे स्वागत केले जात आहे. आनंदी आनंदाची पाखरण होत आहे. पण महारणी आणि महाराज अत्यंत शोकग्रस्त झाले आहेत. राजमहालावरही दुःखाचे सावट पसरल्यामुळे अवकळा निर्माण झाली आहे. राजमहालातील सेविका ही तणावात वावरत आहेत. दबक्या आवाजात कुजबूज सुरु आहे. “महराजांची महती काय वर्णावी? दैवी गुणांची देणगी त्यांना होती. दयाळू आणि कुशल राजकारणी, प्रतापी, मदनाची प्रतीकृतीच म्हणावी लागेल. त्यांचे तेजस्वी नेत्र, सरळ नासिका चेहऱ्यावरील अढळ हास्य! महराजांचे सौंदर्य औदर्य आणि स्नेहशील वागणूक अद्वितीय अशीच होती. त्याच स्त्रीराज्यातल्या राजमहालातले स्थान आकाशास्थ सूर्यासारखे असलेले आता महाराजरूपी सूर्याशिवाय आता निस्तेज वाटेल. त्यांच्या शिवाय सिंहासनाला शोभा नाही. हा गोरक्ष नामक राहू ग्रह आला आणि महाराजांच्या रूपातल्या सूर्याला ग्रासून निघाला आहे. आम्हा सकळांचा प्राण करणारा तो यम आहे. नेमका आमच्या देशातच विध्वंस करण्यासाठी कुठून आला! आमच्या खजिन्यावर दरोडा घालून लुटालूट केली, आम्हाला हिनदीन आणि ढूंबळे खंक केले. याला कपाळ करंटे म्हणवे नाही तर काय? सुखाचा, ऐश्वर्याचा ठेवा झिडकारून दारोदार भिक मागण्यात याला अनाद वाटतोय, कसली भिक्कारडी लक्षणे हयाची. शिळे तुकडे चावण्याच्या आठवणींनी पंचपक्वान्नाची चव लागेना हा श्वानाला. सुग्रास अन्न, तलम राजवस्त्रे, महालमाड्या सोडून फाटक्या चिंध्या नेसून अरण्यात फिरेल हा अभागी. आता महाराजांचे दर्शन आम्हाला कसे होणार? म्लान वदनाने, अश्रू ढाळत अशी शेरेबाजी त्या सेविका एकमेकांशी करीत होत्या.

गोरक्षानाथांनी कुबडी, फावडी बाहेर काढून त्यावरची धूळ साफ केली. भगवी वस्त्रे परिधान केली. कपाळावर भस्माचे पट्टे ओढले. मध्यभागी टिळा लावला, गळयात रुद्राक्षाच्या माळा घातल्या. कर्णमुद्रिका, शिंगी, सारंगी धारण करून पायात खडावा घातल्या. गुरुदेवांपुढे जाऊन गर्जना केली, “अल्लख निरंजन! जय जय गुरदेव.” श्रीगुरुचरणांवर मस्तक टेकवून नमन केले आणि म्हणाले, “महराज चालावे आता विलंब होत आहे.” महाराणी त्याक्षणी दुःखवेगात म्हणाली, “पुत्रा थोड्यावेळासाठी थांब! शेवटचे चार घास अन्न तरी शांतपणे खाऊ दे त्यांना.” घाईघाईने पक्वान्नाची ताटे केली. गुरुशिष्य जेवणासाठी पाटावर बसले. अश्रू ढाळत महराणी स्वतः वाढत आहे, अनावर अश्रु पदराने पुसत आहे महराणीला हा दुःखद प्रसंग सहन होत नाहीये, काळीजात आग आग होत आहे. दिनवाणी, हताश झालेली महाराणी आसवांना आवरत कोरड्या आवाजात म्हणाली, “महाराज! मीननाथाला येथे ठेवता की आपल्याबरोबर घेऊन जाता?” महाराज म्हणाले, “आपली इच्छा असेल तसे करू.” “मीननाथाला आपण घेऊन जावे. तुम्ही जवळ होता म्हणून मारुती पासून त्याचे रक्षण होत होते. आता तुम्ही गेल्यावर त्याचे कोण रक्षण करील? तसेच उपरिचर वसुंच्या शापाची काळमर्यादा संपत आली असल्याने तुम्ही गेल्यानंतर पाठोपाठ मला ही ते सिंहलद्वीपात घेऊन जातील, मग मीननाथ येथे मातापित्या शिवाय निराधार, एकटा पडेल, म्हणून आपण त्याला सोबत घेऊन जाणे योग्य होईल.'' “जशी आपली इच्छा!” असं म्हणून कसेतरी चार घास खाऊन महाराज ताटावरून उठले. त्यांच्या पाठोपाठ गोरक्षही उठला.

स्त्री राज्यातून एक प्रौढ, एक तरुण आणि एक बालक असे तीन संन्यासी निघण्याच्या तयारीत आहेत. महराजांनी राजवस्त्रा ऐवजी परिधान केलेली रंकाची वस्त्रे पाहून महाराणीने हंबरडाच फोडला. सेविकांमध्येही गदारोळ उठला, त्यांच्या संयमाची परिसीमाच झाली. त्यांनी गोरक्षनाथाला गराडा घातला. रडत, आक्रंदत भिजलेल्या डोळयांनी त्या म्हणाल्या, “गोरक्षनाथा!! एवढा कठोर होऊ नकोस, आमचा प्राण घेऊन जाऊ नकोस. ही सुखसंपत्ती, राजवैभव, महालमाड्या, हत्तीघोडे, हिरेमोती, हिरेरत्ने, माणिकमोती, राजसिंहासन लाथाडून वनवासात जाऊ नकोस. आम्ही तुझ्या दासी होऊन तुझी सेवा करू. तुज बरोबर रतीक्रीडा करू. येथील कला कुशलता, विद्या संपन्नता, नृत्य गायन वादन कुशलता, मधुशाला, वस्त्रालंकार सोडून जाऊ नकोस. आम्ही तुला चंदनाचे उटणे लाऊन स्नान घालू. सिंहासनावर तू देवधीदेव इंद्राप्रमाणे शोभशील. मुलुख, किल्ले कोट दुर्ग यांची मालकी सोडून वनचर होऊ नकोस. अविचाराने अशा सुखाला लाथ मारशील तर दुःखी होशील. शाली दुशाली, कंठालंकार, षड्रस पक्वान्ने, पुष्पशय्या यांची संगत सोडून वनातील दगडधोंडे, काट्याकुट्यांत, उन्हातान्हात कंदमुळे खात पायपीट करण्याचे भिकेचे डोहाळे सोडून दे. येथून जाऊ नकोस, परचक्रापासून सुरक्षित असलेला हा वैभवशाली स्त्रीदेश सोडून जाऊ नकोस,” अशी रडारड सुरु होती.

पूर्व कल्पना देऊन नियोजित कार्यक्रम ठरलेला, पुन्हा सहा महिन्यांची वाढ मान्य केली आणि नेमके श्रीगुरुंसह निघायच्या क्षणी तिथला गदारोळ पाहून गोरक्षनाथ कातावले. त्यांना आपला क्षोभ आवरता आला नाही. ते जरबेने म्हणाले, “बंद करा ही व्यर्थ वटवट आणि गप्प रहा. तुमचे स्वर्गीय वैभव तुम्हालाच लखलाभ होवो, आम्हाला त्याची मुळीच आसक्ती नाही. प्राण नसलेल्या देहाची गरजच नाही. भूमीची शैय्या आणि आकाशाची ओढणी (चादर) अंगावर घेऊन योगनिद्रा घेण्यात आम्हाला सुख वाटते. आत्ता आमच्या मार्गातून दूर व्हा जादूगरीणींनो!” असे म्हणत त्यांच्या गराड्यातून बाहेर पडले.

महाराणी किलोत्तलेला वंदन करून गोरक्षनाथांनी मीननाथाला खांद्यावर घेतला. गुरुदेवांचा हात धरून ते बाहेर निघाले. महाराणीने गुपचूपपणे सोन्याची वीट, महाराजांच्या झोळीत टाकली. प्राणनाथाला निरोप देण्यासाठी मैनाकिनी नगराबाहेरपर्यंत आली. नाथांच्या पायांवर मस्तक टेकून त्यांची पायधूळ मस्तकी धारण केली. गोरक्षाला ममतेने कवटाळत म्हणाली, “गोरक्षा, माझे पंचप्राण तुझ्या हाती सोपवत आहे. लहान बाळासारखी त्यांना भूक सहन होत नाही. मीननाथ आणि त्यांच्यात काही फरक नाही, एक लहान बाळ तर दुसरे मोठे बाळ आहे. तुला अधिक काय सांगावे, तू तर त्यांचा संतशिष्य आहेस. तेव्हा माझे प्राण आणि ममता यांना सांभाळ…” मच्छिंद्रनाथांकडे अश्रूभरीत नेत्राने पाहत, दिनवाणा चेहेरा करून म्हणाली, “नाथ! आता आपली भेट कधी होईल?, स्वामी तुम्हाला कुठे पाहू? तुमच्याशिवाय कशी जगू नाथ ss.”

गोरक्षनाथांनी मनात विचार केला, “आता पटकन निघाले पाहिजे नाहीतर घात व्हायचा, श्रीगुरूंना जर ममतेचा झटका आला तर सर्वांवर पाणी फिरायचे. तेव्हा झटकन निघावे.” श्रीगुरूंचा हात धरून त्यांना ओढीत गोरक्षनाथ निघाला. पावलापावलांनी अंतर वाढत जात होते, मैनाकिनीचे आक्रंदन थांबत नव्हते. ती आता फक्त मैनाकिनी होती, महाराणीचा आवेश गळून पडला होता. तिच्या डोळयां समक्ष तिच्या स्वामींचे आणि पुत्राचे हरण होत होते. पुन्हा कधी भेट होईल याची काहीही शाश्वती नाही. गाय वासराची ताटातूट झाली. शोकाला पारावर राहिला नाही. महराजांचेही पाय उचलेनात रस्ताही संपता संपेना. गोरक्ष श्रीगुरूंचा हात धरून त्यांना अक्षरशः ओढत आहे. अंतर दुरावत होते, मैनाकिनीच्या डोळयांसमोर तिघांच्या आकृत्या लहान लहान होत चालल्या होत्या. रस्त्याने वळण घेतले आणि तिघेही टेकडी मागे अदृश्य झाले. समोरच्या दृश्यात आता भकासपणा आला.

मैनाकिनी सुन्न झाली, पायातले त्राण संपले, स्वतःला मटकन धरणीवर झोकून दिले आणि कळवळून छाती बडवून घेऊ लागली. स्वामींचे गुण आठवून रडू लागली. आक्रोशाची परिसीमा झाली. “नाथ! आता कधी दृष्टीस पडणार? माझा दयाळू स्वामी कुठे गेला? माझे काळीज गोरक्षाने तोडून नेले. माझी अंधळयाची काठी, माझ्या नेत्रज्योती गोरक्षाने नेल्या. आता मी परत राजवाड्यावर कशासाठी जाऊ? स्वामीविना वैभवशाली राजनगर म्हणजे भयाण खंडहरच झाले असणार. मला नको ते राजवैभव. मला माझा नाथ परत आणून द्या. त्यांच्या शिवाय मी जगू शकत नाही.” असं बरळत दुःखातिरेकाने विलाप करीत तिने धडकन जमिनीवर डोक आपटून अंग टाकले. तिची शुद्ध हरपली.

स्वर्गस्थ उपरिचर वसुंच्या कानावर हा शोकध्वनी पोहोचला. तत्काळ ते विमान सज्ज करून तेथे पोहोचले, तिला सावध करून म्हणाले, ‘‘पद्मिनी, काय हा वेडेपणा आरंभला आहेस? तू तर स्वर्गातली सौंदर्यवती आहेस ना? येथे शापामुळे आली होतीस; आता तू शापमुक्त झालीस म्हणून आनंद मान आणि परत चल.’ असं म्हणून तिचे डोळे पुसले आणि तिला घेऊन महालाकडे निघाले. कसला शाप आणि कसली शापमुक्ती; काय चूक आणि काय बरोबर, सुख काय आणि दुःख काय हे किलोत्त्लेला काही कळत नव्हते. याक्षणी ती केवळ वेडी प्रेमिका आणि हळवी माता होती.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने गोहत्येचे पातक नष्ट होऊन तपश्चर्येचे बळात वृद्धी होते.